**विकेंद्रित खरेदी योजना - पणन हंगाम २०१८-१९ मध्ये तांदूळ (CMR) साठवणुकीसाठी केंद्रीय वखार महामंडळाची (CWC) गोदामे भाडेतत्वावर घेणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
## शासन निर्णय, क्रमांकः गोदाम- २०१८/प्र.क्र.२५४/नापु-२९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२

**दिनांक: १५ फेब्रुवारी, २०१९**

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः खरेदी-१०१४/ प्र.क्र.१७/ नापू-२९, दिनांक १४.०१.२०१६

२) शासन निर्णय क्रमांकः खरेदी १०१८/प्र.क्र.१८५ /नापु-२९, दिनांक २९.०९.२०१८

**प्रस्तावना :-**

खरीप व रब्बी पणन हंगाम २०१६-१७ या दोन्ही हंगामापासून केंद्र शासनाच्या निर्देशानुसार संपूर्ण राज्यात “विकेंद्रित खरेदी योजना” (Decentralized Procurement Scheme) राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार सदर योजनेची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्यात येत आहे. यापूर्वी भारतीय अन्न महामंडळामार्फत किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेतंर्गत धानाची भरडाई करून तयार होणारा तांदूळ त्यांच्या अखत्यारीतील गोदामांत जमा केला जात होता. तथापि पणन हंगाम २०१६-१७ पासून विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत तयार होणारा तांदूळ राज्य शासनाच्या गोदामात जमा करून लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत वितरीत करावयाचा आहे. त्यासाठी अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाकडे साठवणूकीची पुरेशी यंत्रणा उपलब्ध नसल्यामुळे शासनाच्या इतर विभागांची, महामंडळांची व केंद्र शासनाच्या महामंडळांची या कामासाठी मदत घेणे आवश्यक आहे. केंद्रीय वखार महामंडळ हा केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील सार्वजनिक उपक्रम असून या सार्वजनिक उपक्रमामार्फत अन्नधान्य साठवणूकीसाठी राज्यात ब-याच ठिकाणी गोदामांची बांधकामे करण्यात आलेली आहेत. यापूर्वी भारतीय अन्न महामंडळामार्फत खरेदी होत असताना, केंद्रीय वखार महामंडळाची गोदामे भाडयाने घेतली जात होती. तरी सदर बाब विचारात घेऊन राज्य शासनाकडून खरेदी केलेला तांदूळ किंवा अन्य धान्यसाठा साठवणूकीसाठी केंद्रीय वखार महामंडळाची गोदामे भाडे तत्वावर घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

हंगाम २०१८-१९ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेतंर्गत राज्यात विविध ठिकाणी खरेदी करण्यात आलेले धान व त्याची भरडाई करुन प्राप्त होणारा तांदूळ (CMR) साठवणूकीसाठी केंद्रीय वखार महामंडळाची गोदामे त्यांच्याशी करण्यात येणा-या करारामधील अटी व शर्तीनुसार भाडेतत्वावर घेण्यात यावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१५११५६४५७९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2019.02.15 12:02:54 +05'30'

**( सतीश सुपे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.मंत्री (अनापुवग्रासं.) यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री (अनापुवग्रासं) यांचे खाजगी सचिव,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद/विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. सर्व मा.विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य,
७. मा.मुख्य सचिव,
८. सर्व अप्पर मुख्य सचिव/सर्व प्रधान सचिव/सचिव,
९. अप्पर मुख्य सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग,
१०. प्रधान सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.)
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई.
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.
१३. प्रादेशिक व्यवस्थापक, केंद्रीय वखार महामंडळ, सेक्टर-२०, तुर्भे रेल्वे स्टेशनजवळ, नवी मुंबई, ४००७०३.
१४. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५. सर्व जिल्हाधिकारी/सर्व विभागीय आयुक्त.
१६. सर्व उप आयुक्त (पुरवठा).
१७. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/सर्व अन्नधान वितरण अधिकारी.
१८. निवडनस्ती (नापु-२९).